**केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-११२२/प्र.क्र.३७/रेशीम कक्ष
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २४ मार्च, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.प्रावियो-२०१८/प्र.क्र. ९०/रेशीम कक्ष, दिनांक २४ मे, २०१९.
२) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-64/17/IAC-SCSP&TSP/2021-22/TS, दिनांक २२ मार्च, २०२२.
३) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-९/सिल्क समग्र./Gen,SC&ST/केंव रा हि/ B.D.S./४५४, दिनांक २९ मार्च, २०२२.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल, २०२२.
५) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-37/1/CSS (Silk Samagra) Maharashtra/2018-19/Vol-1, दिनांक १४ जून, २०२२.
६) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्यासन-९/केंद्र पुरस्कृत/सिल्क समग्र/ माहीती/११३६, दिनांक ०३ ऑगस्ट, २०२२.
७) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्यासन-९/केंद्र पुरस्कृत/सिल्क समग्र/ निधी/बी.डी.एस/२२-२३/१६९८, दिनांक ०८ डिसेंबर, २०२२.
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८ फेब्रुवारी, २०२३

प्रस्तावना : -

केंद्र पुरस्कृत “सिल्क समग्र” (ISDSI) योजनेंतर्गत सन २०२१-२२ या वर्षासाठी सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता प्राप्त केंद्र हिस्सा ₹८३.३७२६ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹४१.६९ लक्ष असा एकूण ₹१२५.०५४६ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक (रेशीम) यांनी संदर्भाधीन दिनांक २९ मार्च, २०२२ च्या पत्रान्वये सादर केला आहे. उक्त केंद्र हिस्स्याचा निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात वापरण्यास केंद्रीय रेशीम मंडळाने संदर्भाधीन दिनांक १४ जून, २०२२ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी केलेल्या विनंतीनुसार उक्त निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र पुरस्कृत “सिल्क समग्र” (ISDSI) योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी प्राप्त केंद्र हिस्सा ₹८३.३७२६ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹४१.६९० लक्ष असा एकूण ₹१२५.०६२६ लक्ष इतका निधी पुढील तक्त्यात नमूद केलेल्या बाबींसाठी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम रु.लाखात)**

| योजनेचे नाव (१) | युनिट कॉस्ट (२) | लाभार्थी संख्या (३) | केंद्र हिस्सा ५० टक्के (४) | राज्य हिस्सा २५ टक्के (५) | एकूण निधी (४+५) (६) |
|---|---|---|---|---|---|
| **अ) सर्वसाधारण लाभार्थी** | | | | | |
| कीटक संगोपनगृह बांधकामासाठी सहाय्यता योजना (१००० स्के.फुट) | १.६८६४ | ९० | ७५.८८७६ | ३७.९४० | ११३.८२७६ |
| कीटक संगोपन साहित्य सहाय्य | ०.५९७० | १० | २.९८५० | १.४९० | ४.४७७० |
| किसान नर्सरी विकासासाठी सहाय्य | १.५० | ६ | ४.५०० | २.२५० | ६.७५०० |
| | | **एकुण रक्कम** | **८३.३७२६** | **४१.६९०** | **१२५.०६२६** |

२. सदर निधी ISDSI योजनेच्या सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजूरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सुचनांनुसार संचालक (रेशीम) यांनी खर्च करावा. तसेच, ज्या योजनांसाठी व बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे, त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

३. सदर योजनेंतर्गत अनुदान देताना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नानाजी देशमुख कृषि संजिवणी योजना (पोक्रा) व इतर शासकीय योजनेंतर्गत लाभ दिला नसल्याची खात्री करुनच पात्र लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

४. सदर योजनेंखाली केंद्र हिश्श्यासाठी ₹८३.३७२६ लक्ष ( अक्षरी रुपये त्र्याऐंशी लक्ष सदवतीस हजार दोनशे साठ फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च “मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२८५११२६९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच, राज्य हिश्श्यासाठी ₹ ४१.९६ लक्ष ( अक्षरी रुपये एक्केचाळीस लक्ष श्यान्नव हजार मात्र ) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा “मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४५) रेशीम उत्पादक, खादी ग्रामोद्योग व ग्रामोद्योग विकास (कार्यक्रम) (२८५११२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक , रेशीम , रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी ( V००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१४३/२०२३/व्यय-२, दि.२१.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०३२४१९२७०२७२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA V JAGTAP

Digitally signed by ALKA V JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA V JAGTAP
Date: 2023.03.24 19:31:28 +05'30'

**( अलका वि जगताप)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
४) सदस्य-सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु.
५) कोषागार अधिकारी, नागपूर.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
९) उप सचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
११) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१२) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (रेशीम कक्ष).